राष्ट्रीय क्षयरोग निर्मुलन कार्यक्रम अंतर्गत (NTEP) क्षयरुग्णांचे थुंकी नमुने तपासणीसाठी आवश्यक असणारे LED FM खरेदी करण्यासाठी निविदा प्रक्रिया राबविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२०/प्र.क्र.११/आरोग्य -७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २४ जुलै, २०२०.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.प्रशामा-०६१९/प्र.क्र.३६५/आरोग्य-७, दिनांक ०१.०८.२०१९.
२) सहसंचालक, आरोग्य सेवा (क्षयरोग व कुष्ठरोग), पुणे यांचे पत्र क्र. ससंआसे/कुष्ठवक्षय/LED FM खरेदी प्रस्ताव /९८६९-७१/२०२०, दिनांक ०४.०३.२०२०.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (क्षयरोग व कुष्ठरोग), पुणे यांचे पत्र क्र. ससंआसे/कुष्ठवक्षय/LED FM खरेदी प्रस्ताव /३५८१३/२०२०, दिनांक ०८.०७.२०२०.
४) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांची मंजूर टिप्पणी दिनांक २७.०२.२०२०.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त दिनांक ०१.०८.२०१९ च्या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील पीआयपी अंतर्गत विविध लेखा शिर्षान्वये मंजूर असलेल्या अनुदानातून विविध कार्यक्रमाकरीता आवश्यक असलेल्या छपाई साहित्य करीता निविदा प्रक्रियासाठीच्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. यामध्ये अनुक्रमांक १७, सुधारित राष्ट्रीय क्षयरोग नियंत्रण कार्यक्रम (RNTCP) Procurement of Sleeves and Drug Boxes (FMR Code-६.५.२) अंतर्गत उपलब्ध असलेल्या रु.१६२.६७१ लक्ष एवढ्या अनुदानातून MDR/XDR क्षयरुग्ण यांचेसाठी दर महिन्याला क्षयरोग विरोधी औषधे पोहोचती करण्यासाठी कार्डबोर्ड बॉक्सेस खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

तथापि, केंद्रीय क्षयरोग विभाग, नवी दिल्ली (Central TB Division) यांनी The Programmatic Management of Drug Resistant TB (PMDT) बाबत निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचानाप्रमाणे नवीन औषध पथ्ये ( New drug Regimen) अंमलात येणार आहे. यामध्ये

इंजेक्शनचा वापर वगळण्यात येणार असल्याने Type-B या कार्डबोर्ड बॉक्स ची संख्या कमी होणार आहे.तसेच सन २०१८-१९ व २०१९-२० या आर्थिक वर्षातील खरेदीची प्रक्रिया अद्याप पूर्ण झाली नसल्यामुळे सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात खरेदी करण्यात येणारे बॉक्स पुरेसे होणार आहेत. त्यामुळे सदर शिल्लक राहणाऱ्या रु.१६२.६७१ लक्ष एवढे अनुदानाचे FMR code ६.१.१.१८a - Procurement of Equipment या शिर्षांतर्गत पुनर्वियोजन करून सदर अनुदान क्षयरुग्णांचे थुंकी नमुने तपासणीसाठी आवश्यक असणारे LED FM खरेदी करण्याचा प्रस्ताव प्रशासकीय मान्यतेसाठी विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :-

राज्यामध्ये एकूण १५२० मान्यताप्राप्त सुक्ष्मदर्शी केंद्रे (DMC) असून त्यापैकी १८८ ठिकाणी LED FM उपलब्ध आहेत.इतर सूक्ष्मदर्शी केंद्रांमध्ये Binocular Microscope द्वारे थुंकी नमुने तपासले जातात.LED FM सूक्ष्मदर्शी यंत्राने कमी वेळात जास्त प्रमाणात अचूक तपासणी शक्य होत असल्याचे नमूद करण्यात आले आहे. केंद्रीय क्षयरोग विभाग,नवी दिल्ली (Central TB Division) यांच्या मार्गदर्शक सूचनानुसार राज्यामध्ये प्रत्येक सार्वजनिक आरोग्य संस्थेत सूक्ष्मदर्शी केंद्र स्थापित करावयाचे आहे. सध्या राज्यामध्ये एकूण ३३४ LED FM ची मागणी प्राप्त झाली आहे. तरी कार्यक्रम प्रमुखांनी प्रस्तावित केल्यानुसार या पूर्वी शासन निर्णय दिनांक ०१.०८.२०१९ मधील अनुक्रमांक १७ येथे देण्यात आलेली कार्ड बोर्ड खरेदीची प्रक्रिया पूर्ण झाली नसल्यामुळे सदर प्रशासकीय मान्यता रद्द करून LED FM खरेदीसाठी पुढीलप्रमाणे निविदा प्रक्रिया राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. :-

**FMR Code 6.1.1.18a ( Reappropriated from FMR code 6.5.2)**
**Budgetary provision: Rs 162.671 lakh Proposal Amount Rs 1,62,66,750/-**

| Name of Item | Approx. Rate (Rs.) | Total Required Quantity | Approx.Total Cost |
|---|---|---|---|
| LED FM (Light Emitting Diode Fluorescence Microscope | 70,725 | 230 | 1,62,66,750/- |

०२. सदर प्रशासकीय मान्यता ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.:-

१. सदर बाबींच्या खरेदीची आवश्यकता /मागणी याची शहनिशा/खातरजमा करण्यात यावी. तदनंतरच सदर बाबींची निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.
२. सदरहू बाबींचे विनिदेश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. सदरहू बाबींचे तांत्रिक विनिदेश ( Technical Specifications) संबंधित तज्ञांनी ( तांत्रिक समिती /अधिकारी )यांनी मान्य केलेल्या विनिदेशानुसारच असावेत. तसेच, सदर तांत्रिक

विनिदेश (Technical Specifications) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रीतीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यात (PIP) मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विनिदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधित कार्यक्रम प्रमुखांची राहील. प्रस्तावात समाविष्ट बाबींवरच निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

३. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-३/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ अन्वये प्रसिद्ध करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची सुधारित नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

४. प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दर करार, National Pharmaceutical Pricing Authority (NPPA) यांच्याकडील उपलब्ध असलेले न्यूनतम दर विचारात घेण्यात यावेत.तसेच हाफकिन संस्थे कडून सदर बाबींची खरेदी झाली असल्यास अथवा होत असल्यास संबंधित निविदेत प्राप्त झालेले न्यूनतम दर विचारात घेऊन त्या दरांना अंदाजित दर म्हणून गृहीत धरण्यात यावे व त्या नुसार निविदेकारिता मागणी नोंदविताना उपकरणांच्या संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रीयेअंती दर निश्चित करण्यात यावा.सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबबत आणि संबधित पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे. त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५. सदर बाबींबाबत पुरवठापूर्व/पुरवठाउत्तर नमुना याछुद्रिक तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करून ते प्रमाणित विनिदेशानुसार असल्याची खात्री करून घ्यावी.

६. सदरहू बाबींसाठी होणारा खर्च हा सन २०१९-२० च्या मंजूर प्रकल्प अंमलबजावणी आराखड्यातील FMR Code ६.५.२ मधील रु.१६२.६७१ लक्ष ह्या पुनर्वियोजानाद्वारे FMR Code ६.१.१.१८a या लेखाशीर्षाखाली तरतूद केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदराची निविदा प्रक्रिया प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

७. तसेच या बाबींची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही याची दक्षता घ्यावी.

८. संपूर्ण निविदा प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

९. शासन निर्णय,वित्त विभाग, क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनिमय, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग

पहिला, उपविभाग-२ मधील अ.क्र.४, नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

१०.निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यावर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

११.शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.खरेदी २०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

०३. उपरोक्त अनुक्रमांक १ ते ११ येथील अटींची पूर्तता व खरेदी नियमानुसार व आवश्यकतेनुसार आहे हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई व सम्बन्धित कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

०४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनिमय, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,भाग पहिला,उपविभाग-२ मधील अ.क्र.४, नियम क्र.७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामुग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजुरी देण्यासाठी प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७१७१५२०२८५८१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2020.07.24 15:57:57 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान संचालक, मुंबई.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
५. सर्व सहसंचालक ( आरोग्य सेवा आयुक्तालयामार्फत )

६. उपसंचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७. सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९. निवड नस्ती (कार्यासन-आरोग्य-७).